# <u>महाराष्ट्र शासन</u>

क्र. व्हीपीएम २०१७/प्र.क्र.१७४/पंरा-४

दुरध्वनी क्रमांक ०२२- २२०१७१०६
E mail - sopr4.rdd-mh@nic.in

ग्रामविकास विभाग,
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई -४०० ००१.

दिनांक : १५ नोव्हेंबर,२०१९

प्रति,

मुख्य कार्यकारी अधिकारी,
जिल्हा परिषद, सर्व.

**विषय** - माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत धोरण-२०१५ नुसार ग्रामपंचायतीच्या क्षेत्रातील माहिती तंत्रज्ञान/माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना मालमत्ता कर आकारणेबाबत.

**संदर्भ**- उद्योग,उर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्र.आयटीपी-२०१३/(प्र.क्र.२६५)/उद्योग-२,दि.२५ ऑगस्ट,२०१५.

महोदय,

उपरोक्त विषयांकित प्रकरणी सदर्भाधीन शासन निर्णयान्वये माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२०१५ जाहीर करण्यात आले आहे. सदरील शासन निर्णयास अनुसरून कळविण्यात येते की, ग्रामविकास विभागाच्या अधिपत्याखालील ग्रामपंचायतींनी त्यांच्या अधिकार क्षेत्रातील मालमत्तांवर मालमत्ता कर ज्याप्रमाणे अन्य उद्योगांना लागू करण्यात आलेला आहे त्याप्रमाणेच माहिती तंत्रज्ञान/माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांनाही आकारण्यात यावा. माहिती तंत्रज्ञान/माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना निवासी दराच्या सममूल्य दराने मालमत्ता कर आकारता येणार नाही.

सदरील पत्र सर्व संबंधितांनी आपल्या अधिनस्त सर्व अधिकारी/कर्मचारी व ग्रामपंचायती यांच्या निदर्शनास आणण्यात यावे तसेच त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

सदरील शासन पत्र उद्योग विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३६/अनौ.स./२०१७/उ-२, दि.१७.११.२०१७ रोजीच्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९१११५१५४७००३७२० असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला

Vijay Madhukar Lite

Digitally signed by Vijay Madhukar Lite
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aa18499b692d308a40797619538db58ee3bc79bac9dd1def2cf4d3871080cbed, cn=Vijay Madhukar Lite
Date: 2019.11.15 16:44:53 +05'30'

( विजय लिटे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत-उद्योग,उर्जा व कामगार विभाग/कार्यासन उद्योग-२ यांना माहितीस्तव अग्रेषित.